सामाजिक विकासाच्या योजना प्रत्यक्षात कार्यान्वित होण्यासाठी व त्यांची प्रभाविपणे अंमलबजावणी करण्यासाठी व त्यामध्ये समन्वय घडवून आणण्यासाठी एक विशेष कक्ष (सेल) निर्माण करणेबाबत.
- आकस्मिकता निधी विवरण

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : बीसीसी-२००३/सीआर-१११/०३/१६-अ(साविस),
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : १९ नोव्हेंबर, २००३.

**शासन निर्णय :**

राज्य शासनाचा वर्ष २००३-२००४ करीता अर्थसंकल्प सामाजिक न्याय अर्थसंकल्पावर आधारित होता . या अर्थसंकल्पात विविध विभागाच्या ब-याच नवीन संकल्पना अंतर्भूत करण्यात आल्या होत्या . सामाजिक जबाबदारी अधिनियम, सामाजिक निर्देशांक इत्यादींच्या अनुषंगाने ब-याच योजनांचा अंतर्भाव अर्थसंकल्पात झालेला होता. या सर्व नवीन योजनांची व्यवस्थीत बांधणी करुन त्यांना विनाविलंब अंमलात आणण्यासाठी तसेच मागासवर्गीयांसाठी सामाजिक क्षेत्रातील योजना राबविण्याकरीता विविध स्तरावर निर्णय घेण्याकरीता संबंधीत विभागांशी समन्वय साधण्याची आवश्यकता आहे. सामाजिक विकासाच्या विविध योजना राबविण्यासाठी तसेच या संबंधी विविध विभागाशी संपर्क साधून या योजनांचे प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागामध्ये सामाजिक विकास कक्ष अपर मुख्य सचिव (सामाजिक विकास समन्वय) यांच्या अधिपत्याखाली निर्माण करण्यात आलेला आहे. या कक्षासाठी निम्नलिखीतप्रमाणे २२ पदे निर्माण करण्यात आलेली आहेत. सदर पदे निर्माण करण्याबाबत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आस्थापना-००३/प्र.क्र.७/२००३/१६-अ, दिनांक ११ सप्टेंबर,२००३ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव | २६००० अधिक भत्ते | १ |
| २ | उप सचिव | १२०००-१६६०० | १ |
| ३ | अवर सचिव | १००००-१५२०० | १ |
| ४ | कक्ष अधिकारी | ६५००-१०००० | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | सहायक | ५५००-९००० | ४ |
| ६ | निवडश्रेणी लघुलेखक | ७४५०-११५०० | १ |
| ७ | लघुलेखक(उच्चश्रेणी) ६५००-१०५०० | | २ |
| ८ | लघुलेखक(निम्नश्रेणी) | ५५००-९००० | १ |
| ९ | लिपिक टंकलेखक | ३०५०-४९०० | ३ |
| १० | शिपाई | २५५०-३२०० | ४ |
| ११ | वाहन चालक | ३०५०-४९०० | २ |
| | एकूण | | २२ |

उपरोक्त पदांच्या वेतन व भत्त्यावरील खर्च "२०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा (०९०) सचिवालय-(००)(०१) सामान्य प्रशासन विभाग ०१ वेतन-संगणक संकेतांक २०५२००२५-मागणी क्र.ए-४" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर २२ पदांवरील वेतनाचा खर्च तसेच प्रवास,कार्यालयीन खर्च यासाठी दि.३१.१२.२००३ या कालावधीपर्यंत खर्च करण्यास शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक : आकनि-११०३/९८/अर्थसंकल्प-१३ संकेतांक क्र.८०००-०९-१ दिनांक १८ नोव्हेंबर,२००३ अन्वये रु.२७,७९,०००/- (रुपये सत्ताविस लक्ष एकोणऐंशी हजार फक्त) आकस्मिकता निधीतून अग्रिम मंजूर केलेले आहे. सदर निधी सह सचिव तथा नियंत्रक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. या निधीची विगत खालीलप्रमाणे आहे.

**(अ) आवर्ती खर्च**

| | | |
|---|---|---|
| १) | वेतन | रु. ५,४४,०००/- |
| २) | प्रवासखर्च | रु. ५०,०००/- |
| ३) | कार्यालयीन खर्च | रु. १,६६,०००/- |
| ४) | इंधन | रु ३४,०००/- |
| | एकूण | रु. ७,९४,०००/- |

**(ब) अनावर्ती खर्च**

१) कार्यालयीन खर्च रु. १९,८५,०००/-

अ + ब एकूण रु. २७,७९,०००/-

**सदर प्रकरणात सदर आगाऊ रकमेतून खर्च करतांना सादर करण्यात येणाऱ्या देयकांवर आकस्मिकता निधी अग्रिम शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक बीसीसी-२००३/प्र.क्र.१११/०३/१६-ब (सा.वि.स.), दि.१८.११.२००३ अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे.**

वरील पदावरील खर्च वेतन भत्ते, प्रवास खर्च आणि कार्यालयीन खर्च, इंधन खर्च इ. आकस्मिकता निधीतून घेतलेल्या अग्रिमातून दि. ३१ डिसेंबर, २००३ पूर्वी करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(सुभाष दिगंबर)**
**उप सचिव**
**सामान्य प्रशासन विभाग**

प्रति,

मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
अपर मुख्य सचिव (सा.वि.स.)
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सामान्य प्रशासन विभागातील कार्या.क्र.१६-ब/१९/२२/२४/२५/२६,
वित्त विभाग,कार्यासन विसू-१.